राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम (NRDWP) पेयजल स्त्रोत शाश्वतते (sustainability) अंतर्गत सौर ऊर्जा पंपाचा वापर करुन विंधण विहिरीवर आधारित लघु नळ पाणी पुरवठा योजना राज्यात राबविण्याबाबत .

महाराष्ट्र शासन
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,
शासन निर्णय क्र. ग्रापापु-५३१०/प्र.क्र.२१७/पापु-१५
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :-२१ ऑगस्ट, २०१०

वाचा: १. पा.पु.व स्व.विभाग, शासन निर्णय क्र. ग्रापापु-५३१०/प्र.क्र.०४/पापु-१५, दिनांक ११ जानेवारी, २०१०.
२. पा.पु.व स्व.विभाग,शासन निर्णय क्र. ग्रापाधो-११०९/प्र.क्र.१०४(अ)/पापु-०७, दिनांक १७ मार्च,२०१०.

प्रस्तावना : -

भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेने अस्तित्वात असलेल्या उच्च क्षमतेच्या विंधण विहिरींवर दुहेरी पंप व्यवस्थेवर आधारित लघु नळ पाणी पुरवठा योजना विकसित केली असून ती राज्यात राबविण्यात येत आहे. या योजनेत विद्युत पंप व वीज ऊर्जेची आवश्यकता आहे. तसेच, वीज ऊर्जा (पुरवठा) उपलब्धतेवर गाव /वाडी /वस्तीची निवड करण्यात येते. त्यामुळे वीज पुरवठा उपलब्ध नसलेल्या गाव/वाड्या / वस्त्या या कार्यक्रमापासून वंचित राहतात. अशा गाव/वाड्या/वस्त्यांतील उच्च क्षमतेच्या विंधण विहिरींवर सौर ऊर्जा पंप बसविल्यास जनतेला नळ पाणी पुरवठा योजनांचा लाभ देणे शक्य होईल. पारंपारिक ऊर्जा स्त्रोतांची मर्यादित साधनसंपत्ती विचारात घेता, भविष्यात पारंपारिक ऊर्जा स्त्रोताची क्षमता निश्चितच अपु-या पडणार आहेत, याचाही विचार करून अपारंपारिक उर्जा स्त्रोतांच्या वापरावर भर देणे अपेक्षित आहे.

२. या सर्व बाबींचा विचार करून विंधण विहिरीवर आधारित लघु नळ पाणी पुरवठा योजनेत विद्युत ऊर्जेवर चालणा-या पंपाऐवजी सौर ऊर्जेवर चालणारा पंप बसवून सदर योजना संपूर्ण राज्यात राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील उच्च क्षमतेच्या विंधण विहिरींवर राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत शाश्वततेंतर्गत दुहेरी पंपावर आधारित लघु नळ पाणी पुरवठा योजना सौर ऊर्जा पंप बसवून राज्यात राबविण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

***सौर ऊर्जेवर आधारीत पंपाचा वापर करुन विंधण विहिरीवर आधारीत लघु नळ पाणी पुरवठा योजनेच्या अंमलबजावणीसाठी मार्गदर्शक तत्वे :***

***योजनेच्या अंमलबजावणीसाठी मार्गदर्शक तत्वे :-***

१) वाडी-वस्तीच्या निवडीचे निकष : -ज्या वाडया / वस्त्यांवर वीज पुरवठा उपलब्ध नाही, ज्या वाडया / वस्त्यांवर तेथील भौगोलिक परिस्थितीमुळे वीज पुरवठा घेणे आर्थिकदृष्टया किफायतशीर नाही, तसेच ज्या वाड्या / वस्त्या पिण्याच्या पाण्यासाठी केवळ विंधण विहिरीवर आधारित आहेत, अशा वाड्या / वस्त्यांची या योजनेसाठी निवड प्राथम्याने करण्यात यावी.

२) **अंमलबजावणी:-** दुहेरी पंपावर आधारित लघु नळ पाणी पुरवठा योजनांची अंमलबजावणी संदर्भाधीन शासन निर्णयानुसार करण्यात यावी. तथापि, त्यामध्ये सौर ऊर्जा पंपाचा वापर करण्यात यावा.

३) **सौर ऊर्जा पंपाचे तांत्रिक विनिर्देश:-** महाराष्ट्र ऊर्जा विकास यंत्रणा (M.E.D.A.) यांचे दर करारावर असलेले सौर ऊर्जा पंप घेणे अपेक्षित आहे. त्यांचे तांत्रिक विनिर्देश सोबतच्या विवरणपत्र १ मध्ये दर्शविण्यात आले आहे. तर याबाबतची माहितीपुस्तिका सोबत जोडली आहे. सौर ऊर्जा पंपाबाबतचे दर करार उपलब्ध नसल्यास जाहीर निविदा काढून ग्रामपंचायतीने/जिल्हा परिषदेने सौर ऊर्जा पंपाची खरेदी करावी.

शासनाच्या प्रचलित धोरणानुसार सदर योजना ग्रामपंचायतीमार्फत राबवावयाची आहे. योजनेसाठी आवश्यक साहित्य सामुग्रीची खरेदी करताना ग्रामपंचायतींनी शासन निर्णय, दिनांक ३ सप्टेंबर २००३ मधील मार्गदर्शक तत्त्वांनुसार शासनाच्या महाराष्ट्र ऊर्जा विकास यंत्रणा (M.E.D.A.), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण आणि जिल्हा परिषदेच्या दरकरारानुसारच साहित्याची खरेदी करावी. या दरांपेक्षा कमी दरांमध्ये याच गुणवत्तेची साहित्य सामुग्री मिळत असल्यास, मुख्य कार्यकारी अधिकारी यांची पूर्वपरवानगी घेऊनच साहित्याची खरेदी करावी. जिल्हा परिषदेने योजनेसाठी आवश्यक सर्व साहित्य सामुग्रीचे दरकरार निश्चित करावेत व किमान दरांच्या पुरवठादारांची नांवे ग्रामपंचायतींना कळवावीत.

४) दर करार करताना, करारामध्ये सौर ऊर्जा पंप संचाची, पॅनेल व अनुषंगिक साहित्य सामुग्रींची किमान ५ वर्षांची वार्षिक देखभाल दुरुस्तीची अट नमूद करण्यात यावी.

५) शासन निर्णय, दिनांक १७ मार्च, २०१० मधील मार्गदर्शक तत्त्वांनुसार गावांकडून योजनेची मागणी प्राप्त झाल्यावर मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद हे मागणीबाबत सहाय्यक

भूवैज्ञानिक, उपअभियंता(यांत्रिकी) आणि संबंधित गट विकास अधिकारी यांचेमार्फत तांत्रिक पडताळणी करुन घेतील.

६) **लोकवर्गणी:-** सदर योजना ही शाश्वततेवर आधारीत असल्याने यास लोकवर्गणीच अट लागू राहणार नाही**.**

७) ***अनुदान* :-** या योजनेसाठी केंद्र शासनाच्या राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम (स्त्रोत शाश्वतता) या कार्यक्रमाखाली प्रत्यक्ष कामाच्या अंमलबजावणीसाठी व सहाय्यक कामांसाठी अनुदान उपलब्ध होईल. सौर ऊर्जा पंपासाठी कमाल रुपये ३.१० लक्ष मर्यादा असून त्यापेक्षा जास्त खर्च अपेक्षित नाही. तसेच, सौर पंपाकरीता मिळणारे अनुदान शासनाच्या खात्यामध्ये जमा करावे. योजनेतील उर्वरित उपांगावरील खर्च संदर्भाधीन शासन निर्णयाच्या मर्यादेत राहून करावा.

*८)* ***अनुदान वितरण कार्यप्रणाली : -***प्रस्तुत योजनांसाठी शासनाद्वारे संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांचेकडे अनुदान उपलब्ध करुन दिले जाईल. जिल्हा समितीद्वारे मंजूर कामासाठी आवश्यक अनुदानाची मागणी वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांनी सादर केल्यानंतर संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांचेकडून संबंधित जिल्हयांना अनुदान वर्ग करण्यात येईल.

९) **योजनेचे हस्तांतरण :-** योजनेची कामे पूर्ण होऊन योजना कार्यरत झाल्यानंतर योजना राबविणा-या समितीने योजना ग्रामपंचायतीकडे पूर्णपणे हस्तांतरीत करावी.

योजनेच्या कामाचे समन्वयक म्हणून सहसंचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा व तांत्रिक बाबींचे समन्वयन सह संचालक (अभियांत्रिकी) भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा हे काम पाहतील. तसेच योजना राबवितासाठी ग्राम पंचायतींनां / जिल्हा परिषदांना आवश्यक ते तांत्रिक मार्गदर्शन करतील. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे यांच्यावर या योजनेच्या प्रगती व संनियंत्रणाची जबाबदारी सोपविण्यात येत आहे.

**१०) पाणीपट्टी व योजनेची देखभाल दुरुस्ती :-**

कार्यान्वित योजना ग्रामपंचायतीस हस्तांतरीत केल्यानंतर ती सुरळीत पणे सुरु असावी यासाठी हस्तांतरणानंतर भविष्यातील देखभाल दुरुस्ती व इतर अनुषांगिक बाबींवरील सर्व खर्चाची जबाबदारी ग्रामपंचायतीची असेल. याकरिता पाणीपट्टीच्या स्वरुपात निधीगोळा करण्यासाठी ग्रामपंचायतीने प्रत्येक योजनेसाठी स्थानिक स्तरावर वाडी-वस्तीतील योजनेच्या लाभधारकांची उपसमिती गठीत करावी. ही उपसमिती त्या योजनेपुरते पाणी पट्टीचे दर निश्चित करुन गोळा होणा-या निधीतून योजनेच्या देखभाल दुरुस्तीच्या कामांवरील खर्चाबाबत निर्णय घेईल. तथापी, या बाबत प्रचलित शासन संदर्भान्वये

अंमलबजावणी करण्यात यावी. हातपंपाची व वीज पंपाची स्वतंत्र वर्गणी या योजनेस लागु राहाणार नाही.

११) **सुरक्षा** :-या योजनेतील सौर ऊर्जेसाठीची पॅनेल्स, ॲटो ट्रॅकींग सिस्टीम या बाबी मौल्यवान असल्यामुळे त्यांच्या सुरक्षिततेच्या दृष्टीने सौर ऊर्जा पॅनेल्स्ना तारेचे कुंपण घालणेची जबाबदारी ग्रामपंचायतीची राहील, यावर होणारा खर्च योजनेच्या निधीतून अनुज्ञेय असेल.

२. वरील मार्गदर्शक सूचना या शासन निर्णयाच्या दिनांकापासून अंमलात येतील. मात्र ज्या ठिकाणी प्रायोगिक तत्वावर अशा योजनांची कामे सुरु केली असून योजना प्रगतीपथावर आहेत, अशा योजनांदेखील याच धोरणाच्या आधारे पूर्ण कराव्यात.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.mahaashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक सांकेतांक क्र. २०१००८२३१२४२३४००१ असा आहे.

*महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या नावाने व आदेशानुसार,*

*(मालीनी वि. शंकर)*
*प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन*

प्रति,

१. विभागीय आयुक्त, सर्व
२. जिल्हाधिकारी (सर्व)
३. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व
५. सह संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
६. सह संचालक (अभि.) भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
७. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, सर्व
८. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, सर्व
९. मुख्य खोदन अभियंता, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे / नागपूर
१०. वरिष्ठ भूवैज्ञानिक , भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,सर्व
११. उप अभियंता (यांत्रिकी), यांत्रिकी उप विभाग, जिल्हा परिषद सर्व.
१२. सर्व नियंत्रक अधिकारी, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व कार्यासने
१४. निवड नस्ती पापु-१५

# जोडपत्र -१

*सौर ऊर्जा पंपाचे तांत्रिक विनिर्देश*

सौर ऊर्जेवरील ७५० ते ९०० वॅट्स (Watts) ए.सी /डी.सी. पंप संच व त्याकरिता आवश्यक सौर पॅनल्स ॲटो ट्रॅकिंग व्यवस्थेसह पुरवठा करणे व ५ वर्षाकरिता मोफत देखभाल दुरुस्ती करणे. यामध्ये खालील साहित्याचा समावेश असेल.

i. ७५० ते ९०० वॅट्स (Watts) सौर ऊर्जेवरील ए.सी./डी.सी. पंप व त्याकरिता आवश्यक सौर पॅनल्स ॲटो ट्रॅकिंग व्यवस्थेसह व सुरक्षेसाठी लोखंडी जाळीसह.

ii. उत्सर्ग : कमाल ५००० लिटर्स प्रती दिन (एल.पी.डी.) ७० मिटर हेडसाठी

iii. २.५ -- ४ मि.मि.२ सबमर्सिबल केबल. फ्लॅट - थ्री कोर. IS : ६९४ प्रमाणे.

iv. कंट्रोल पॅनेल रेन प्रिव्हेन्टीव्ह बॉक्स आवश्यक उभारणी साहित्यासह.

v. सौर ऊर्जेवरील पंपाची व हातपंपाची उभारणी करणे,स्पेशल वॉटर चेंबर व स्टेनलेस स्टीलचे बॉटम निप्पल बसविणे, ( संकल्प चित्र पृ. /प.वि. वर ठेवले आहे)

vi. उपरोक्त सर्व साहित्याच्या व सौर ऊर्जा पंपासाठी २५ मि.मि.व्यासाच्या एचडीपीई पाईपच्या वाहतुक खर्चासह.